सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास वेतन बाबीसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-सकबो-२०२४/प्र.क्र.३६/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक-२५ फेब्रुवारी, २०२५.

संदर्भ :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२. केंद्रीय समाजकल्याण बोर्डाचे पत्र क्र. (e-९३४५२) ०१६/१३/२०२१-CSWB/२४५२, दि.२४.०५.२०२३.
३. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.सकबो-२०२३/प्र.क्र.७५/का-१०, दि.१९.०१.२०२४.
४. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.सकबो-२०२४/प्र.क्र.३६/का-१०, दि.१९.०४.२०२४, दि.०६.०८.२०२४, दि.०६.०९.२०२४, दि.२६.०९.२०२४, दि.२२.१०.२०२४, दि.२६.११.२०२४, दि.३०.१२.२०२४ व दि.२७.०१.२०२५.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

प्रस्तावना-

महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड कार्यालय कायमस्वरुपी बंद करुन बोर्डाकडील कर्मचारी व योजना ह्या महिला व बाल विकास विभागांतर्गत इतर कार्यालयात सामावून घेण्याबाबतच्या प्रस्तावावर अंतिम निर्णय होईपर्यंत महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाच्या मुख्यालयातील सध्या कार्यरत १९ कर्मचारी यांचे वेतन व २१ सेवानिवृत्ती वेतनधारकांचे निवृत्तीवेतन तसेच केंद्र हिश्श्याच्या वेतनेत्तर बाबींवरील खर्च राज्य शासनाच्या हिश्श्यातून भागविण्यास मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१९.०१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्चाकरिता २२३५ बी ९४२ या संगणक संकेतांकाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) उद्दिष्टाकरिता ₹१८१.६७ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर निधीपैकी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डास संदर्भाधीन दि.१९.०४.२०२४, दि.०६.०८.२०२४, दि.०६.०९.२०२४, दि.२६.०९.२०२४, दि.२२.१०.२०२४, दि.२६.११.२०२४, दि.३०.१२.२०२४ व दि.२७.०१.२०२५ च्या शासन निर्णयान्वये ₹१५७.७० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला होता. सदर अर्थसंकल्पीत निधीच्या अविरीत

निधीपैकी महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील कर्मचारी यांच्या फेब्रुवारी, २०२५ च्या वेतनावरील खर्चासाठी ₹ १३.२० लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डातील कर्मचारी यांचे वेतनावरील खर्चासाठी विवरणपत्रातील रकाना क्रमांक (२) मधील लेखाशीर्ष/ उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक (५) प्रमाणे एकूण **₹ १३.२० लक्ष (अक्षरी रुपये तेरा लक्ष वीस हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | मागणी क्र.एक्स-१,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२, समाजकल्याण, १०२, बाल कल्याण,<br>(०२) (०४) महाराष्ट्र राज्य समाजकल्याण मंडळाला सहायक अनुदान (अनिवार्य),<br>(२२३५ बी ९४२ )<br>३६, सहायक अनुदाने (वेतन) | **१८१.६७** | **१५७.७०** | **१३.२०** |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे हे राहतील. त्यांचेकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी सदर निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई यांनी घ्यावी.

४. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी कोषागारातून एकदम आहरित न करता महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्डाची दरमहा खर्चाची / निधीची आवश्यकता तपासून खर्चाचे देयक कोषागारात सादर करावे. जेणेकरुन विनाकरण निधी महाराष्ट्र राज्य समाज कल्याण बोर्डाकडे शिल्लक राहणार नाही, याची दक्षता घ्यावी.

खर्चाचे प्रयोजन नसताना सदर निधी एकत्रितरित्या आहरित करुन महाराष्ट्र राज्य समाज कल्याण बोर्डाने त्यांच्या बँक खात्यात जमा केल्यास या अनियमिततेची संपूर्ण जबाबदारी नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई यांनी घ्यावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२५१५१३२३५९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2025.02.25 15:14:04 +05'30'

**( साहेबराव भोये )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई-७१,
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.